**महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळास (MIEB) रू. ९.७० कोटी इतका निधी सन २०१८-१९ या वर्षाकरिता उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः शैगुवा-२०१८/प्र.क्र.१४१/१८/एस.डी-६**
मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २१ जानेवारी, २०१९

वाचा -

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शैगुवा-२०१६/(२९/१६)/एस.डी.-६, दिनांक १४ ऑक्टोबर, २०१६
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शैगुवा-२०१७/(१५२/१७)/एस.डी.-६, दिनांक ३० नोव्हेंबर, २०१७
३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शैगुवा-२०१७/(१५२/१७)/एस.डी.-६, दिनांक ०२ जानेवारी, २०१८
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२/०४/२०१८
५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शैगुवा-२०१७/(१५२/१७)/एस.डी.-६, दिनांक १५ डिसेंबर, २०१८
६) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण) तथा महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ, पुणे यांचे पत्र क्र.मआशिमं//आ.मा./२०१९-२०/७, दिनांक २१ जानेवारी, २०१९

प्रस्तावना-

महाराष्ट्र प्रगतशील राज्य असून राज्यातील शाळा आंतरराष्ट्रीय शैक्षणिक मानके प्राप्त करणाऱ्या शाळा असाव्यात तसेच राज्यातील मुलांना आंतरराष्ट्रीय दर्जाचे उत्तम शिक्षण देण्यासाठी शासनाने दिनांक १४ ऑक्टोबर, २०१६ रोजी आंतरराष्ट्रीय शैक्षणिक दर्जाच्या १०० शाळा राज्यात पहिल्या टप्प्यात निर्माण करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आलेला आहे. यानुसार शासन निर्णय दिनांक ३० नोव्हेंबर, २०१७ नुसार आंतरराष्ट्रीय शैक्षणिक दर्जाच्या शाळा निर्माण करण्यासाठी निकष निश्चित करण्यात आले आहेत.

शासन निर्णय दिनांक ०२ जानेवारी, २०१८ अन्वये राज्यात निर्माण करावयाच्या आंतरराष्ट्रीय दर्जाच्या शाळांमध्ये होणारे अध्ययन-अध्यापन आंतरराष्ट्रीय मानकांप्रमाणे असण्याकरिता शैक्षणिक दृष्ट्या पुरेसे स्वातंत्र्य व स्वायतत्ता मिळणे गरजेचे आहे. या पार्श्वभूमीवर राज्यात या शाळांच्या संलग्नतेकरिता महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ स्थापन करण्यात आले आहे.

महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ हे प्राथमिक अवस्थेत असल्याने सदर मंडळ कार्यान्वित करण्यासाठी प्रतिवर्ष रू.१० कोटी एवढा निधी अनिवार्य खर्चाखाली १० वर्षांकरीता सहाय्यक अनुदान या स्वरुपात उपलब्ध करुन देण्याचा निर्णय मा.मंत्रीमंडळाच्या दि.११ डिसेंबर, २०१८ रोजीच्या मंत्रीमंडळ बैठकीमध्ये घेण्यात आला होता. सदर बैठकीत घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने संचालक,

महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण) तथा महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ, पुणे यांनी त्यांच्या उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील दि.२१ जानेवारी, २०१९ रोजीच्या पत्रान्वये रू.९.७० कोटी इतका निधी सन २०१८-१९ या वर्षाकरिता उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. त्यास अनुसरुन रु.९.७० कोटी इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

**शासन निर्णय :-**

संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद (विद्या प्राधिकरण) तथा महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ, पुणे यांच्या उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील दि.२१ जानेवारी, २०१९ रोजीच्या प्रस्तावानुसार महाराष्ट्र आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळासाठी **(**MIEB**)** रू. ९.७० कोटी (रूपये नऊ कोटी सत्तर लाख फक्त) इतका निधी सन २०१८-१९ या वर्षाकरिता उपलब्ध करुन देण्यात येत आहे. यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक अधिकारी व लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

२. वरीलप्रमाणे वितरित करण्यात आलेला रू.९.७० कोटी (रूपये नऊ कोटी सत्तर लाख फक्त) इतक्या निधीचा खर्च "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण, ११०, अशासकीय माध्यमिक शाळांना सहाय्य, (००) (०१), सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (अनिवार्य), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) (२२०२ ०४४२)" या लेखाशिर्षांतर्गत सन २०१८-१९ या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०२/०४/२०१८ च्या शासन परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा. सन २०१८-१९ या वित्तीय वर्षाच्या अखेरीस अखर्चित रक्कम शासनाकडे परत करण्यात यावी. सदर निधी आहरित करुन वितरित करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे, यांना " नियंत्रक अधिकारी " तर लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे यांना " आहरण व संवितरण अधिकारी " म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४८/व्यय-५, दि.१५/०१/२०१९ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१२११७२०३५४१२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna Siddharth Kharat

Digitally signed by Suvarna Siddharth Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=065279b98828b1456ad0d62a97fa45ee948af8abe5a27104d4e132c5bd1d93a, cn=Suvarna Siddharth Kharat
Date: 2019.01.21 17:54:40 +05'30'

**( डॉ. सुवर्णा खरात )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. मा. विरोधी पक्ष नेता, (विधान सभा/ विधान परिषद), विधानभवन, मुंबई.
४. सर्व मा. विधान सभा सदस्य/ विधान परिषद सदस्य, विधानभवन, मुंबई.

५. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा.
८. राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा, मुंबई.
९. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे यांचे विशेष कार्य अधिकारी, मुंबई.
१०.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
११.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१२. संचालक ,लेखा व कोषागारे ,महाराष्ट्र राज्य ,मुंबई - ६३
१३.संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
१४.शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), शिक्षण संचालनालय, पुणे .
१५.शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. शिक्षण संचालक, अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण संचालनालय, पुणे
१७. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.
१८. विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व)
१९.शिक्षणाधिकारी सर्व(माध्यमिक, प्राथमिक, निरंतर)
२०.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२१.लेखाधिकारी, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे
२२.कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प/रोखशाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२३.निवड नस्ती, एस.डी. ६.